हरित रोखे (Green Bonds) उभारण्यासंदर्भात समिती गठीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एमआयएस-१०.२३/प्र.क्र.२७/अर्थोपाय**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १२ जुलै, २०२३.

**प्रस्तावना :**

राज्य शासनाने सन २०२३-२४ च्या अर्थसंकल्पीय भाषणात ग्रीन बॉण्डबाबत "हवामान बदलांच्या समस्यांचा मुकाबला करण्यासाठी केंद्र शासनाने ग्रीन बॉण्डमधून

१६ हजार कोटी उभारण्याचे ठरविले आहे. राज्यासाठी सन २०२४ पर्यंत ५ हजार कोटी रुपये ग्रीन बॉण्डमधून उभारण्यात येतील. त्यामधून नवीकरणीय ऊर्जा, हरित इमारती, हरित हायड्रोजन, इलेक्ट्रीक मोबिलिटी व चार्जिंग सुविधा इत्यादी उपक्रम हाती घेण्यात येतील" अशी घोषणा केली आहे. सदर घोषणेच्या अंमलबजावणीसाठी राज्यस्तरीय "महाराष्ट्र ग्रीन फायनान्स वर्किंग कमिटी (MGFWC)" गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

वरील बाब विचारात घेता, खालीलप्रमाणे राज्यस्तरीय 'महाराष्ट्र ग्रीन फायनान्स वर्कींग कमिटी (MGFWC)' गठीत करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे पदनाम व विभाग | समितीमधील पदनाम |
|---|---|---|
| १. | अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग | अध्यक्ष |
| २. | सचिव/प्रधान सचिव/अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग | सदस्य |
| ३. | सचिव/प्रधान सचिव/अपर मुख्य सचिव (वित्तीय सुधारणा), वित्त विभाग | सदस्य |
| ४. | सचिव / प्रधान सचिव/अपर मुख्य सचिव (व्यय), वित्त विभाग | सदस्य |
| ५. | सचिव/प्रधान सचिव/अपर मुख्य सचिव (ऊर्जा), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग | सदस्य |
| ६. | सचिव/प्रधान सचिव/अपर मुख्य सचिव, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग | सदस्य |
| ७. | सचिव/प्रधान सचिव/अपर मुख्य सचिव (परिवहन), गृह विभाग | सदस्य |
| ८. | सचिव/प्रधान सचिव/अपर मुख्य सचिव (वने), महसूल व वन विभाग | सदस्य |
| ९. | सह सचिव / उप सचिव (अर्थोपाय), वित्त विभाग | सदस्य सचिव |

२. त्याचप्रमाणे आवश्यकतेनुसार इतर विभागाच्या सचिवांना निमंत्रित सदस्य म्हणून बोलविले जाऊ शकेल. तसेच निवडलेले प्रकल्प अपेक्षित उद्दिष्टांशी सुसंगत आहेत याची खात्री करण्यासाठी इतर विभाग आणि क्षेत्रातील तज्ञांचा सल्ला घेतला जाऊ शकतो.

३. महाराष्ट्र ग्रीन फायनान्स वर्कींग कमिटी (MGFWC) च्या कामकाजाचे स्वरुप पुढीलप्रमाणे असेल :-

१) राज्याच्या हरित रोख्यांसाठी फ्रेमवर्क (Framework for Green Bonds) अंतिम करणे.
२) हरित रोखे (Green Bonds) अंतर्गत हाती घ्यावयाच्या कामांना/ प्रकल्पांना मंजूरी देणे.
३) हरित रोख्याच्या फ्रेमवर्कनुसार कालबद्ध कार्यवाही होत असल्याबाबत संनियंत्रण करणे.
४) फ्रेमवर्कमध्ये नमूद केलेल्या समितीच्या इतर कार्यकक्षेच्या (Terms of Reference) अनुषंगाने कार्यवाही करणे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०७१२१७४९४४७५०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SAKSHI PUNAJI KANDALGAONKAR

Digitally signed by SAKSHI PUNAJI KANDALGAONKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FINANCE DEPARTMENT, 2.5.4.20=00bfb3244ca305fb7d6656186739156bae6ef1b9edde6bc47de5410071abb00a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E323B409C3C55060B6B701B627B4FE14DE623DF64F608F6DB4FC294CE0F94A91, cn=SAKSHI PUNAJI KANDALGAONKAR
Date: 2023.07.12 17:56:14 +05'30'

**( साक्षी कांदळगांवकर )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव.
२) मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३) मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
४) मा. उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५) मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
६) सर्व सन्माननिय सदस्य विधानपरिषद/ विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सदस्य, विधानभवन, मुंबई.
७) मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव.
८) उप मुख्यमंत्र्यांचे सचिव.
९) सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१०) मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/ विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
११) महालेखापाल, महाराष्ट्र- १/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
१२) महालेखापाल, महाराष्ट्र- १/२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
१३) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानभवन सचिवालय, मुंबई, (५ प्रती)
१४) निवडनस्ती, अर्थोपाय.

-----------------